राज्यातील निवासी क्रीडा प्रबोधनी/क्रीडा विद्यापीठ /क्रीडा अकादमी यांना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी दैंनदिन विविध खर्चासाठी निधी वितरीत करण्याबाबत.
लेखाशिर्ष (२२०४-२०६४)

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-३३२४/प्र.क्र.१३१/क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २५ फेब्रुवारी २०२५

**वाचा :-**

१. शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक- शाशिम-१०९५/प्र.क्र.१६६/क्रीयुसे-३, दिनांक १८ नोव्हेंबर, १९९५.
२. शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक-शाशिम-१०९५/प्र.क्र.१६६/क्रीयुसे-३, दिनांक २७ मार्च, १९९७.
३. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्रमांक: निविप्र//कीप्र/२०२४-२५(५) /का-११/१५६, दिनांक २८/६/२०२४.
४. शासन पत्र दिनांक १९/८/२०२४
५. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्रमांक: निविप्र//कीप्र/२०२४-२५(५) /का-११/५८८, दिनांक २१/१०/२०२४.

**प्रस्तावना :-**

राज्यात शारिरीक शिक्षण व क्रीडा यांचा दर्जा उंचविण्यासाठी, क्रीडा विद्यापीठ/क्रीडा अकादमींची स्थापन करण्याचा पहिला टप्पा म्हणून पुणे येथील शिवछत्रपती क्रीडानगरी येथे मध्यवर्ती क्रीडा केंद्र व राज्यातील वेगवेगळया १४ ठिकाणी क्रीडा प्रबोधिनी स्थापन करण्यास संदर्भाधिन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे.

सद्य:स्थितीत राज्यामध्ये ७ क्रीडा प्रबोधिनी/क्रीडा अकादमी कार्यान्वित आहेत. या निवासी प्रबोधिनींमध्ये निवासी प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षण देण्यात येत असल्यामुळे त्यांचे भोजन, वैद्यकीय उपचार, स्पर्धा सहभाग, शैक्षणिक खर्च, क्रीडा गणवेश, क्रीडा साहित्य खरेदी, कार्यालयीन कर्मचाऱ्यांचे मानधन व क्रीडा प्रबोधिनीच्या दैनंदिन देखभाल व दुरुस्ती इ.खर्चासाठी आवश्यक निधी उपलब्ध करुन देण्याची मागणी क्रीडा संचालनालयाने उपरोक्त संदर्भ क्र. ५ येथील प्रस्तावान्वये केली आहे. त्यानुषंगाने कार्यान्वित क्रीडा निवासी प्रबोधिनी /क्रीडा अकादमींना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतुदीमधून मार्च, २०२५ अखेरपर्यंतच्या खर्चासाठी दैंनदिन विविध बाबींवरील खर्च भागविण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील कार्यरत ८ निवासी क्रीडा प्रबोधिनींना /क्रीडा अकादमींना विविध आवश्यक बाबींवरील खर्च भागविण्यासाठी रुपये १५९८.१० लक्ष इतका निधी याद्वारे वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार संदर्भ क्रं. ५ येथील पत्रान्वये सादर केलेल्या तपशीलानुसार शिवछत्रपती क्रीडा प्रबोधिनी, पुणे या

मध्यवर्ती क्रीडा प्रबोधिनीच्या अंतर्गत नागपूर, छत्रपती संभाजीनगर, नाशिक, अमरावती, अकोला, पुणे, कोल्हापूर या ७ निवासी क्रीडा प्रबोधिनींना निधी वितरीत करण्यात यावा.

२. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांनी संदर्भ क्र.४ अन्वये निधी मागणी केलेल्या प्रस्तावामधील बाबींपैकी प्रशिक्षणार्थींना ट्रॅकसूट, टि शर्ट, शॉर्ट, शूज व सॉक्स तसेच क्रीडा गणवेश व क्रीडा साहित्य खरेदीसंदर्भात उद्योग, उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय, दि.०१.१२.२०१६ व दि.०६.०१.२०२० मधील तरतूदी व कार्यपध्दतीनुसार खरेदीची कार्यवाही करणे आवश्यक राहील.

३. उपरोक्त मंजूर निधी मागणी क्रमांक ई-३, मुख्य लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (३३) क्रीडा विद्यापीठ व क्रीडा अकादमी, (३३) (०१) क्रीडा विद्यापीठाची स्थापना (कार्यक्रम), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), संगणक क्रमांक २२०४-२०६४ या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. याकरीता संबंधीत उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा/संबंधित प्राचार्य, निवासी क्रीडा प्रबोधिनी यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. वितरीत केलेल्या निधीच्या विनियोगाबाबत आवश्यक उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ सादर करावे.

५. याप्रमाणे अर्थसंकल्प अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी वित्त विभागाच्या दिनांक २७/७/२०२४ व दिनांक १२/२/२०२५ च्या निधी वितरणाच्या परिपत्रकात नमूद सूचनांची तसेच त्यासोबतच्या परिशिष्टातील नमूद तपासणी सूचीतील सर्व बाबींची पूर्तता होत असल्याचे तसेच याबाबींकरीता दुबार निधी वितरण होणार नाही, याबाबत आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रण अधिकारी यांनी खात्री करुन त्यानंतरच निधी आहरीत करावा. तसेच निधी ज्या बाबींसाठी वितिरीत केला आहे त्याच बाबींसाठी निधी विनियोग करण्यात यावा.

६. उपरोक्त मंजूर निधीतून खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियमपुस्तिकेतील तरतूदी व क्रीडा धोरणासंबंधीच्या सर्व शासन निर्णयातील अटी/शर्तीचे पालन करणे आवश्यक राहील.

७. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.२०१/१४७१, दिनांक ३०/१/२०२५ व वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१३१/व्यय-५, दिनांक १३/२/२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२५१५१४०१४४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2025.02.25 15:14:41 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री ( नगर विकास व गृहनिर्माण ) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
५. मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
७. सर्व सन्मा. विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
८. अपर मुख्य सचिव, (अ.का.) क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक
९. मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
१०. मा. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
११. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. संबंधित जिल्हा कोषगार अधिकारी,
१३. वित्त विभाग (कार्यासन व्यय-५/अर्थसंकल्प-८) मंत्रालय, मुंबई
१४. नियोजन विभाग (कार्यासन-१४७१) मंत्रालय, मुंबई
१५. प्राचार्य, निवासी क्रीडा संकुल, नागपूर, छत्रपती संभाजीनगर, नाशिक, अमरावती, अकोला, पुणे, कोल्हापूर.
१६. अवर सचिव, अर्थसंकल्प कार्यासन, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती (क्रीयुसे-१).